**विधि व न्याय विभाग (खुद्द) मधील अधिकारी /कर्मचारी यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर सेवेत राहण्याच्या पात्रापात्रता आजमावण्यासाठी पुनर्विलोकन करण्याकरिता विभागीय पुनर्विलोकन समिती व अभिवेदनावर विचार करण्याकरिता विभागीय अभिवेदन समिती पुर्नगठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-४३१९/प्र.क्र.८२/१९ /दोन-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०९ जानेवारी, २०२०.

**पहा :-**

१) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्रमांक संकीर्ण ४३१४/प्र.क्र.४६/ कार्यासन-२अ, दि. ०१.०७.२०१४.
२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्रमांक संकीर्ण ४३१४/प्र.क्र.१२८/ कार्यासन-२अ, दि. १९.०९.२०१४.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एलपीएल - २०१७/प्र.क्र.२१/का-१५, दि.१० जून २०१९

**प्रस्तावना :**

०१. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १०(४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचा-यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांची सेवा पुनर्विलोकन करण्यासंदर्भात शासनाचे धोरण होते. त्यानुषंगाने संदर्भ क्र.१ व २ च्या शासन निर्णयान्वये विभागीय पुनर्विलोकन समित्या गठीत करण्यात आल्या आहेत.

०२. आता सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.३ मध्ये नमूद शासन निर्णयान्वये पूर्वीचे सर्व आदेश अधिक्रमित करुन एकत्रित शासन निर्णय केलेला आहे. सदर शासन निर्णयामध्ये प्रामुख्याने खालील तरतुदी आहेत.

**i) गट-अ आणि गट-ब राजपत्रित अधिकारी :-**

**अ) शासन सेवेत वयाच्या ३५ व्या वर्षापूर्वी आलेले अधिकारी / कर्मचारी :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या सुधारित धोरणानुसार शासन सेवेत वयाच्या ३५ व्या वर्षापूर्वी आलेल्या गट-“अ” आणि गट-“ब” च्या राजपत्रित अधिका-यांचे त्यांच्या वयाची ५० वर्षे पूर्ण होतेवेळी किंवा त्यांच्या अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होतेवेळी यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी एकदाच पुनर्विलोकन करावयाचे आहे.

**ब) शासन सेवेत ३५ वर्षानंतर सेवेत आलेले अधिकारी / कर्मचारी :-**

शासन सेवेत ३५ वर्षानंतर सेवेत आलेल्या राजपत्रित अधिका-यांचे वयाच्या ५५ व्या वर्षी पुनर्विलोकन करावयाचे आहे.

**ii) गट-ब (अराजपत्रित), गट क आणि गट ड चे कर्मचारी:-**

गट - “ब” (अराजपत्रित), गट “क” आणि गट - “ड” कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्या वयाच्या ५५ व्या वर्षी किंवा त्यांच्या अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होतेवेळी यापैकी जे अगोदर घडेल तेव्हा पुनर्विलोकन करावयाचे आहे.

iii) पुनर्विलोकन करताना शासकीय अधिकारी /कर्मचारी यांची शासन सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमाविण्यासाठी विहित निकषांच्या आधारे त्यांचे पुनर्विलोकन करुन, सुयोग्य व कार्यक्षम अधिकारी / कर्मचारी यांनाच लोकहितास्तव शासन सेवेत पुढे चालू ठेवावयाचे आहे व अकार्यक्षम तसेच संशयास्पद सचोटी असणा-या अधिकारी / कर्मचारी यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करावयाचे आहे.

iv) प्रत्येक कॅलेंडर वर्षात दिनांक १ ऑगस्ट रोजी पात्रापात्रता तपासण्यासाठी अधिकारी व कर्मचा-यांची वयाची ४९/५४ वर्षे किंवा अर्हताकारी सेवेची ३०/३५ वर्षे पूर्ण करणे यापैकी जे अगोदर घडेल, त्यावेळी त्यांची सूची तयार करणे अपेक्षित असून कॅलेंडर वर्षाच्या शेवटपर्यंत म्हणजे दि.३१ डिसेंबर पर्यंत विभागीय पुनर्विलोकन समिती, विशेष पुनर्विलोकन समिती व अभिवेदन समिती यांनी कार्यवाही पूर्ण करणे अपेक्षित आहे.

०३. संदर्भ क्र.३ वरील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयामध्ये सेवा पुनर्विलोकन व सेवा पुनर्विलोकनानंतर मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या निर्णयाविरुध्द अभिवेदनासंदर्भात कार्यपध्दती व सर्वसाधारण सूचना विहित केल्या आहेत. त्यानुसार विधि व न्याय विभागाच्या आस्थापनेवरील गट-अ, ब, क आणि ड मधील अधिकारी व कर्मचा-यांच्या पुनर्विलोकनासंदर्भात यापूर्वी संदर्भ क्र.१ व २ वरील शासन निर्णयान्वये गठीत समित्यांचे पुनगर्ठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

विधि व न्याय विभागातील (खुद्द) येथील अधिकारी /कर्मचारी यांच्या शासन सेवा पुढे चालू ठेवण्याकरिता पात्रापात्रता आजमाविण्यासाठी समिती गठीत करण्याबाबतचे संदर्भ क्र. १ व २ वरील शासन निर्णय याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहेत.

०२. विधि व न्याय विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील गट"अ","ब","क" आणि ड मधील अधिकारी/ कर्मचारी यांच्या संदर्भात सोबत जोडलेल्या परिशिष्ट - १ प्रमाणे विभागीय पुनर्विलोकन समिती आणि परिशिष्ट - २ प्रमाणे विभागीय अभिवेदन समिती अशा २ स्वतंत्र समित्या गठीत करण्यात येत आहेत. पुनर्विलोकन करताना समितीने परिशिष्ट ३ मधील बाबी तसेच संदर्भ क्र. ३ वरील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयामधील तरतूदी विचारात घ्यावयाच्या आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११०११५४०६८२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajesh Bajirao Ghadge

Digitally signed by Rajesh Bajirao Ghadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf72ed51d101be222757ea3b6d64ed5fc5de8f8529121e097e2203b90069afce, serialNumber=5d6f97dbfefd0a526c757773ea06ac43b9d1dc7c582c6f4747cd504e990f85ff, cn=Rajesh Bajirao Ghadge
Date: 2020.01.10 13:01:05 +05'30'

**( रा. बा. घाडगे )**

सह सचिव (प्रशा), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
३. सचिव (विधि विधान), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४. श्री.रा.बा. घाडगे, सहसचिव (प्रशा), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. श्री.आ. न. वसावे, सहसचिव (सेवा), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. श्री.अ.हि. बनकर, प्रारुपकार-नि- सहसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. श्रीमती अश्विनी सु.सैनी, उप सचिव (विधि), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुबई.
८. श्रीमती सुप्रिया श्री. धावरे, उपप्रारुपकार-नि-उपसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

९. सर्व सहसचिव / उपसचिव /अवरसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई/ नागपूर/औरंगाबाद

१०. श्री.अ. बा. सादिकले, अवर सचिव (प्रशा), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. श्रीमती वैशाली शि. दिघे, अवर सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. सर्व शाखा व कार्यासने,

१३. कार्यासन संग्रहार्थ.

## (विभागीय पुनर्विलोकन समिती)
## परिशिष्ट - १

**विधि व न्याय विभाग (खुद्द) मधील अधिकारी/ कर्मचारी यांच्या सेवा पुनर्विलोकनाकरिता विभागीय समित्यांची रचना तसेच, समितीच्या शिफारशीस अंतिम निर्णयासाठी समुचित प्राधिकारी**

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एलपीएल-२०१७/प्रक्र२१/का-१५, दिनांक १०.०६.२०१९ नूसार )

| अनु क्र. | पदांचे वर्गीकरण | विभागीय पुनर्विलोकन समिती रचना | विभागीय पुनर्विलोकन समितीने केलेल्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी समुचित प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | १)गट-अ (राजपत्रित)(अतिकालिक वरिष्ठ श्रेणी) ग्रेड वेतन १०००० व त्यावरील<br>२) गट-अ (राजपत्रित) (वरिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० व त्यापेक्षा अधिक परंतु १०००० पेक्षा कमी<br>३)गट-अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतन श्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी | **विभागीय पुनर्विलोकन समिती**<br>(१) **अध्यक्ष** : प्रधान सचिव व विधि परामर्शी<br>(२) **सदस्य** : सचिव (विधि विधान)<br>(३) **सदस्य** : सहसचिव (प्रशासन)<br>(४) **सचिव** -: अवर सचिव (आस्थापना) | पात्र गट -अ च्या अधिका-या बाबतच्या विभागीय पुनर्विलोकन समितीने केलेल्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी मा.मंत्रीमहोदयांना सादर करण्यात याव्यात. तथापि मा.मुख्यमंत्री महोदयांच्या थेट नियंत्रणाखाली असलेल्या विभागातील अधिका-यांच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी मा.राज्यमंत्री महोदयांना सादर कराव्यात. |
| | ४) गट-ब (राजपत्रित) | | पात्र गट-ब (राजपत्रित) अधिका-यांच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी मा.राज्यमंत्री महोदयांना सादर कराव्यात. |
| विभागीय पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीनुसार जे गट-अ आणि गट-ब चे अधिकारी, सेवेत चालू राहण्यास निर्विवादपणे अपात्र ठरणार असतील अशा अधिका-यांचे पुनर्विलोकन सामान्य प्रशासन विभागाच्या “विशेष पुनर्विलोकन समिती ” कडून केले जाईल (याबाबत सविस्तर माहिती संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयामध्ये आहे.) | | | |
| २ | गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड कर्मचारी | **विभागीय पुनर्विलोकन समिती**<br>**१) अध्यक्ष** : सह/उप सचिव (आस्थापना)<br>२) **सदस्य** : सह/उपसचिव (सेवा)<br>३) **सदस्य** : श्रीमती सुप्रिया श्री.धावरे, उपप्रारुपकार-नि-उप सचिव (मागासवर्गीय प्रतिनिधी<br>४) **सदस्य सचिव** : अवर सचिव (आस्थापना) | विभागीय पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीनुसार जे गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड चे कर्मचारी पात्र /अपात्र असतील अशा अधिकारी / कर्मचा-यांबाबतच्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी मा.प्रधान सचिव व विधि परामर्शी यांना सादर कराव्यात. |

**समितीची कार्यकक्षा** -: समितीने सेवा पुनर्विलोकनासंदर्भातील कामकाजास प्रत्येक वर्षी माहे ऑगस्ट मध्ये सुरुवात करावी आणि त्या वर्षाच्या शेवटीपर्यंत (डिसेंबर पर्यंत) समितीने कामकाज पूर्ण करावे. समितीने सेवा पुनर्विलोकन करताना संदर्भ क्र.३ वरील शासन निर्णयामधील तरतूदींचे पालन करावे

## (सेवापुनर्विलोकनानंतर विभागीय अभिवेदन समिती)

## परिशिष्ट - २

विधि व न्याय विभाग (खुद्द) मधील अधिकारी /कर्मचारी यांच्या सेवापुनर्विलोकनानंतर मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या निर्णयाविरुध्दच्या अभिवेदनावर विचार करण्याकरिता विभागीय अभिवेदन समितीची रचना, तसेच, समितीच्या शिफारशीस अंतिम निर्णयासाठी समुचित प्राधिकारी

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एलपीएल-२०१७/प्रक्र२१/का-१५, दिनांक १०.०६.२०१९ नूसार)

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>पदांचे वर्गीकरण</th><th>विभागीय अभिवेदन समिती रचना</th><th>विभागीय अभिवेदन समितीने केलेल्या शिफारशी अंतिम निर्णयाकरिता समुचित प्राधिकारी</th></tr>
<tr><td>१</td><td>गट-अ (राजपत्रित) (अतिकालिक वरिष्ठश्रेणी) ग्रेड वेतन १०००० व त्यावरील</td><td>सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि.१.३.२०१७ नुसार आस्थापना मंडळ क्रमांक-१ अभिवेदन समिती असेल</td><td rowspan="2">अंतिम निर्णयासाठी मा.मुख्यमंत्री महोदय समुचित प्राधिकारी आहेत.</td></tr>
<tr><td>२</td><td>गट-अ (राजपत्रित) (वरिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० व त्यापेक्षा अधिक परंतु १०००० पेक्षा कमी</td><td>सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि.१.३.२०१७ नुसार आस्थापना मंडळ क्रमांक-२ अभिवेदन समिती असेल.</td></tr>
<tr><td rowspan="2">३</td><td>१) गट-अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतन श्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी व गट-ब (राजपत्रित)</td><td rowspan="2"><u>विभागीय अभिवेदन समिती</u><br>१) <u>अध्यक्ष</u> : प्रधान सचिव व विधि परामर्शी<br>२) <u>सदस्य</u> : श्रीमती अ.सु.सैनी, उपसचिव (विधि)<br>३) <u>सदस्य सचिव</u> : श्रीमती वै.शि.दिघे, अवर सचिव</td><td>१) गट-अ (राजपत्रित)(कनिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी असलेल्या अधिका-यांच्या बाबतीत व गट-ब (राजपत्रित) अधिका-यांच्या बाबतीत मा.मुख्यमंत्री महोदयांना सादर करावी.</td></tr>
<tr><td>२) गट-ब (अराजपत्रित) गट-क आणि गट-ड कर्मचारी</td><td>२) विधि व न्याय विभागातील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट- ड कर्मचारी यांच्याबाबतीत मा.मुख्य सचिव यांना सादर करावी.</td></tr>
</table>

## परिशिष्ट - ३

## पुनर्विलोकन करताना समितीने विचारात घ्यावयाचे निकष

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एलपीएल-२०१७/प्रक्र२१/का-१५, दिनांक १०.०६.२०१९ नूसार)

| वर्गीकरण | शासन सेवेत पुढे सुरु ठेवण्याकरिता पात्रापात्रता आजमाविण्यासाठी निकष |
| --- | --- |
| गट-अ,गट-ब (राजपत्रित /अराजपत्रित) अधिकारी आणि गट-क कर्मचारी | शारिरिक क्षमता /प्रकृतिमान, निर्विवाद सचोटी व चांगल्यापेक्षा कमी नाही असा गोपनीय अभिलेख (सन २०१७-१८ पासूनच्या कार्यमूल्यामापन अहवालाचे गुणांकन ४ किंवा त्यापेक्षा जास्त असावे.) |
| गट-ड कर्मचारी | शारिरिक क्षमता /प्रकृतिमान, निर्विवाद सचोटी व प्रतिकूल नसतील असे वैयक्तिक नस्तीमधील अभिप्राय (गोपनीय अभिलेख) |

**टिप —निर्विवाद सचोटी, शारिरिक क्षमता / प्रकृतीमान यांची नोंद प्रतिवेदन/पुनर्विलोकन अधिकारी यांचेकडून वार्षिक गोपनीय अभिलेखात घेणे आवश्यक आहे.**